निवृत्तीवेतनधारक/कुटुंब निवृत्तिवेतनधारक यांना पुनर्नियुक्तीनंतर महागाई भत्त्याचे प्रदान करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः सेनिवे-२०१४/प्र.क्र.९९/सेवा-४

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १६ ऑक्टोबर, २०१४.

**संदर्भ**

१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः मकोनि १०००/प्र.क्र.१८८/कोषा प्रशा.५, दिनांक ४ मार्च, २००२

**प्रस्तावना**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १५७ मधील तरतुदीनुसार पुनर्नियुक्त निवृत्तिवेतनधारकांना स्थुल वेतन वजा निवृत्तिवेतन अशातऱ्हेने पुनर्नियुक्तीनंतरचे वेतन निश्चित केले जाते.

पुनर्नियुक्त निवृत्तिवेतन धारकांना महागाई भत्ता कशातऱ्हेने द्यावा याबाबत स्पष्ट सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यांत येत आहेत.

## शासन परिपत्रक

केंद्र अथवा राज्य शासन किंवा स्वायत्त संस्था, खाजगी अनुदानित संस्थामध्ये नियुक्त अथवा पुनर्नियुक्त निवृत्तिवेतनधारकांना/कुटुंब निवृत्तिवेतन धारकांना त्यांच्या निवृत्तिवेतन/ कुटूंब निवृत्तिवेतनावर महागाई भत्ता अनुज्ञेय नाही. पुनर्नियुक्त शासकीय कर्मचाऱ्यास पुनर्नियुक्तीच्या दिनांकास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ च्या नियम १५७ मधील तरतुदीनुसार वेतननिश्चित केल्यानंतर सदर कर्मचारी सेवानिवृत्तिच्या दिनांकास घेत असलेल्या मुळ वेतनावर प्रचलित दराने महागाई भत्ता देण्यात यावा.

उदा. एखादा कर्मचारी सेवानिवृत्ति अखेर रु. २०,००० इतके मुळ वेतन घेत असेल व सेवानिवृत्तिनंतर त्यास रु.१०,००० इतके निवृत्तिवेतन मिळत असेल तर अशा कर्मचाऱ्याच्या पुनर्नियुक्तीनंतर त्यास खालील प्रमाणे लाभ देय राहतील.

| | | |
|---|---|---|
| (अ) | निवृत्तीवेतन | रु.१०,००० |
| (आ) | पुनर्नियुक्तीनंतर निश्चित केलेले वेतन | रु.२०,०००-१०,०००=१०,००० |
| (इ) | महागाई भत्ता (सेवानिवृत्ति अखेरच्या वेतनावर असलेला संपूर्ण महागाई भत्ता). | रु.२०, ००० |

(दि.१/१०/२०१४ रोजी १००% महागाई भत्ता गृहीत धरुन)

एकूण :- रु.४०,०००

२. यापूर्वी नियमित झालेली पुनर्नियुक्त निवृत्तीवेतन धारकांची वेतननिश्चितीची प्रकरणे पुन्हा सुधारीत करण्यांत येऊ नयेत.

३. सेवानिवृत्त कर्मचारी/अधिकाऱ्यास पुनर्नियुक्त करताना सामान्य प्रशासन विभागामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित नियुक्ती अधिकाऱ्याची राहील.

४. शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तिवेतन योजना लागू केला आहे अशा मान्यता व अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यामधील पुनर्नियुक्त निवृत्तिवेतनधारक यांना वरील निर्णय योग्य त्या फेरफारासह लागू राहील.

५.     महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधीचे इतर सर्व अधिकार याचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, वरील निर्णय जिल्हा परिषदांचे पुनर्नियुक्त निवृत्तिवेतनधारक यांनाही लागू राहतील.

६.     यासंबंधीचा खर्च वरील परिच्छेदात नमूद केलेल्या पुनर्नियुक्त निवृत्तिवेतनधारकांची निवृत्तिवेतन ज्या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्या शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या शीर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०१६११४५२६१००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhosale Satish H

Digitally signed by Bhosale Satish H
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=FD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhosale Satish H
Date: 2014.10.16 12:02:31 +05'30'

**स.ह.भोसले**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती),
२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर(१००० प्रती),
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
७) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)
८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
९) उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
१४) राज्यपालांचे सचिव,

१५) मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१६) उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१७) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
१८) *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
१९) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
२०) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
२१) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२२) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२३) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२४) *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
२५) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
२६) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
२७) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
२८) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२९) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.
३०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
३१) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०
३२) अध्यक्ष, महाराष्ट्र स्टेट गव्हर्नमेंट पेंशनर्स असोसिएशन बेळगाव, १०९१, अनंतशयन गल्ली, लक्ष्मी निवास, दुसरा मजला, बेळगांव.
३३) मंत्रालयातील सर्व विभाग,
३४) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
३५) सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
३६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
३७) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
३८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
३९) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
४०) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
४१) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
४२) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
४३) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
४४) सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
४५) कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),

४६) कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
४७) कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
४८) कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
४९) कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर (१० प्रती),
५०) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),
५१) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर (५ प्रती),
५२) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)
५३) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २० (५ प्रती)
५४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,, मुंबई ४ ( ५ प्रती)
५५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५प्रती )
५६) इंडियन नॅशनल कॉँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती )
५७) नॅशनलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१ ( ५ प्रती )
५८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)
५९) वित्त विभागातील सर्व कार्यासने,
६०) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

***पत्राद्वारे.**